**सन २००९-१० मधील पुरक**
**मागणीव्दारे प्राप्त अनुदानाचे वितरण**
**विमानचालन संचालनालय, मुंबई**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्रमांक : एव्हीएन २००९/प्र. क्र.५८६/०८/२८-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३ ऑगस्ट, २००९

वाचा : १) सहाय्यक संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू, मुंबई यांचे क्रमांक डीए/एडीएम/५९८/०९, दि. १ मे,२००९ चे पत्र
२) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक : पूरक १००९/ प्र.क्र.८३/२००९/पंचवीस, दिनांक ८ जुलै, २००९.

**प्रास्ताविक :-**

विमानचालन संचालनालय, मुंबई यांचे दैनंदिन कामकाजासाठी चालू आर्थिक वर्षासाठी एकूण रु. ९,५२,००,०००/- अतिरिक्त खर्चाकरिता अंदाजपत्रकीय तरतूद करण्यासाठी विधी मंडळाच्या जुन, २००९ च्या अधिवेशनामध्ये रु. ९,५२,००,०००/- एवढ्या रकमेची पुरक मागणी सादर करण्यात आली होती. सन २००९-१० या वर्षाचे पुरवणी खर्चास विधी मंडळाने मान्यता दिली असून महाराष्ट्र (पुरवणी) विनियोजन अधिनियम, २००९ (सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक - १३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग ४, दि. २० जून, २००९ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले असून संदर्भाधीन सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ८ जुलै, २००९ च्या परिपत्रकानुसार सदर पुरवणी अनुदान मंजूरी / वितरणासाठी प्रशासकीय विभागांच्या अधिनस्त ठेवण्यात आले आहे.

**शासन निर्णय :-**

२. विमानचालन संचालनालय, मुंबई अंतर्गत कामकाजासाठी चालू आर्थिक वर्षी खाली नमूद केल्याप्रमाणे बाबनिहाय पुरक अनुदान रु.९,५२,००,०००/- (रु. नऊ कोटी बावन्न लक्ष फक्त) या शासन निर्णयाव्दारे संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | ०६, दूरध्वनी, वीज व पाणीशुल्क | रु. ४,७५,०००/- |
| २ | ११, देशांतर्गत प्रवास खर्च | रु. १०,७०,०००/- |
| ३ | १३. कार्यालयीन खर्च | रु. ८८,४७,०००/- |
| ४ | २७. लहान बांधकामे | रु. १,१६,००,०००/- |
| ५ | ५०. इतर खर्च | रु. १,५७,०८,०००/- |
| ६ | ५२. यंत्रसामग्री व साधनसामग्री | रु. ५,७५,००,०००/- |

| | |
|---|---|
| | **एकूण रु. ९,५२,००,०००/-** |

३. यांप्रित्यर्थ सहायक संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** त्याप्रित्यर्थचा खर्च सन २००९-१० या आर्थिक वर्षात. मासिक संगणक वितरण प्रणालीच्या अधीन राहून शासनमान्यताप्राप्त बाबींसाठी करण्यात यावा. बाबनिहाय खर्चाचा मासिक प्रगती अहवाल महालेखापाल /अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई आणि सामान्य प्रशासन विभागाकडे प्रत्येक महिन्याच्या १५ तारखेपर्यंत सादर करावा.

**५.** याप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च सन २००९-१० करिता पूरक मागणीव्दारे खालील लेखाशीर्षातर्गत मंजूर तरतूदीतून भागवावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक ए-४, २०७०, इतर प्रशासनिक सेवा, (११४)परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण, (००)(०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (२०७० ०१५६)

**६.** हा शासन निर्णय संदर्भाधीन सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक दि. ८/७/२००९ अन्वये प्रशासकीय विभागांस प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०८०४१६३५४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

( अं. वि. अंभिरे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
१) संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई,
२) सहायक संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई,
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
७) वित्त विभाग, का.-अर्थसंकल्प-१४/ व्यय-४, मंत्रालय,मुंबई,
८) कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.२५, मंत्रालय, मुंबई ३२,
९) निवड नस्ती.